सांगली जिल्ह्यातील पाटबंधारे प्रकल्पांच्या लाभक्षेत्रातील स्लॅबपात्र खातेदारांच्या जमिनींच्या ७/१२ उताऱ्यावरील इतर अधिकारातील पुनर्वसनाचे राखीव शेरे कमी करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग (म. व पु.)**

**शासन परीपत्रक क्रमांक:-आरपीए/३६२४/७२७/प्र.क्र.२२१/र-४**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक:- १४.०८.२०२४

**वाचा:-** १. महसुल व वन विभाग शासन निर्णय क्र.आरपीए/२०२२/प्र.क्र.०९/र-१, दि. १८.०१.२०२२
२. विभागीय आयुक्त पुणे यांचे पत्र क्र.पुनर्व/लिपीक/आरआर/८९५/२०२२, दि. ०५.०५.२०२२

**प्रस्तावना:-**

राज्यातील पाटबंधारे प्रकल्पांच्या लाभक्षेत्रातील स्लॅबपात्र खातेदारांच्या जमिनींच्या ७/१२ उताऱ्यावरील इतर हक्कातील पुनर्वसनासाठी राखीव असलेले शेरे उठविण्याबाबत महसुल व वन विभाग, शासन निर्णय दिनांक १८.०१.२०२२ अन्वये कार्यपध्दती निश्चित केलेली आहे.

सदर शासन निर्णयानुसार सांगली जिल्ह्यातील पाटबंधारे प्रकल्पांच्या लाभक्षेत्रामधील गटांवरील ज्या स्लॅबपात्र खातेदारांच्या/भूधारकांच्या जमिनींना सिंचनाच्या सुविधा उपलब्ध नाहीत, सिंचनाच्या सुविधा उपलब्ध आहेत किंवा भविष्यात उपलब्ध होणार आहेत, परंतु सदर जमिनींचा संपादन निवाडा किंवा संपादन अद्यापर्यंत करण्यात आलेले नाही, अशा प्रकरणी विभागीय आयुक्त, पुणे यांनी विहित समितीच्या मान्यतेने दिनांक ०५.०५.२०२२ रोजी सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने "पुनर्वसनासाठी राखीव" असे ७/१२ उताऱ्याच्या इतर हक्कात नोंदविलेले शेरे कमी करणेची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परीपत्रक:-**

सांगली जिल्ह्यातील टेंभु व कृष्णा कोयना या २ प्रकल्पाच्या लाभक्षेत्रातील खालील तक्त्यातील अनुक्रमे १५० व १४९ गावांमधील जमिनींच्या हस्तांतरण व्यवहारावर पुनर्वसन अधिनियमानुसार निर्बंध लादण्यासाठी ७/१२ उताऱ्याच्या इतर हक्कात पुनर्वसनासाठी राखीव असे नमुद केलेले शेरे कमी करण्यास खालील अटी व शर्तींच्या अधीन राहुन मान्यता देण्यात येत आहे.

अ) सदर प्रस्तावातील सांगली जिल्ह्यातील कृष्णा कोयना प्रकल्पाच्या लाभक्षेत्रातील गावांतील जमिनीसंदर्भात सन २००० नंतर इतर हक्कातील शेरे नमुद केले आहेत. त्यामुळे याबाबत शासन निर्णय दिनांक १८.०१.२०२२ मधील विहीत कार्यपध्दती पार पाडण्याच्या अटीच्या अधीन राहुन शेरे कमी करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी.

आ) सदर प्रस्तावातील जमिनींचा गट नंबर व त्यामधील क्षेत्र याबाबतची खातरजमा करणे, व सदरचे क्षेत्र संपादीत झालेले नसणे, संपादन निवाडा झालेला नसणे या अटींच्या अधीन राहुन ७/१२ उताऱ्याच्या इतर हक्कातील पुनर्वसनासाठीचे राखीव शेरे उठविणेबाबतची कार्यवाही करण्यात यावी.

इ) सदर जमिनींच्या ७/१२ उताऱ्यावर संबंधितांचे किती क्षेत्र आहे, याबबातची खातरजमा करण्यात यावी, तसेच संबधित भुधारकाच्या क्षेत्रावरीलच इतर हक्कातील पुनर्वसनासाठी राखीव असा शेरा उठविणेबाबतची कार्यवाही करावी.

२) प्रस्तुत प्रकरणी वरीलप्रमाणे आवश्यक ती कार्यवाही तात्काळ करण्यात यावी.

३) सदर आदेशाबाबतची अंमलबजावणी तात्काळ करुन त्याबाबतचा कार्यपालन अहवाल शासनास १५ दिवसांत अहवाल सादर करण्यात यावा.

तक्ता

| प्रकल्प | तालुका | गावे |
|---|---|---|
| टेंभुं | खानापुर | न्हावी, रेणुशेवाडी, निमसोड, विहापुर, सोहोली, बेलवडे, येडे, हिंगणगांव बु., उपाळेवांगी, उपोळेमायणी, सासवडे, तोडोली, तुपेवाडीखुर्द, खेराडेवांगी, खेराडेबु.,तुपेवाडी बु., भिरुवाडी खु., कोतीज, येतगांव, कान्हरवाडी, विखलहोळ, माहुली, गाडेवाडी, भाकुचीवाडी, नागेवाडी, हिंगणगाव खुर्द, वालखेड, वेजेगाव, वाळुज, साळशिंगे, घानवड, गार्डी, नेवरी, आंबेगाव, विटा, होगलवाडी विटा, हरेवाडी विटा, भुरळवाडी विटा, ढवळेश्वर, कळंबी, कार्व, पारे, चिंचणी, बाम्हणी, मांगरुळ, भुर, बाबळेवाडी, लेंगरे, मंद्याळमुटी, जोंधळखिंडी, कान्हारवाडी, रोकाचीवाडी, भांबर्डे, वासुंबे, सुळेवाडी, गुंफाविटा, रेणावी, घोटी बु., घोटी खु., कुर्ली, रेवणगाव, घाडगेवाडी, ढराळेवाडी, बलवडीखा, लांडगेवाडी, बेलापुर, सुलतानगादे, खापरगादे, हिवरे, करंजे, धोंडेवाडी, भडकेवाडी, शेंडगेवाडी, खानापुर मोही, मुलाणवाडी, नेर्ली, अनशिंगे, कोतेवाडी, खंबाळे औंध, कडेंगाव, करांडेवाडी, शाळगांव, रायगांव, कडेपुर, बाभळेवाडी. |
| | आटपाडी | वलवण, घरनिकी, पिंपरी खुर्द, झरे, निंबवडे, विठलापुर, कोठुळी, विभुतवाडी, घानंद, जांभुळणी, कामत, महाडीकवाडी, आवळाई, पळसखेळ, आटपाडी, गोरडवाडी, शेंगणेवाडी, मेटकरवाडी, चिवळे, खरसुंडी, कानकात्रेवाडी, नेलकरंजी, हिवतड, करगणी, बनपुरी, तळेवाडी, शेटेफळे, मासाळवाडी, माडगुळे, पिटकवाडी, गोलतेवाडी, लेंगरेवाडी, तडवळे, बाळेवाडी, दिघंची, विभुतवाडी |
| | तासगाव | बलगवडे, हातनोली, हातनुर, मणेराजुरी, शेरेवाडी, बस्तवडे, वाघापुर, कौलग, पाडळी, धामणी, आरावडी, ख्याजगाव, डोर्ली, सावर्डे, योगेवाडी |
| | कवठेम हांकाळ | आरेवाडी, केरेवाडी, आगळगाव, लंगरपेठ, गर्जेवाडी, ढालेवाडी, इरळी, अलकुड, ढालगाव, लिंबेवाडी, रांजणी, नागज, कोकळे |
| कृष्णा कोंयना | मिरज | काकडवाडी, खरकटवाडी, कानडवाडी, सांबरवाडी, सिध्देवाडी, पायापाचीवाडी, विजयनगर, मन्सुरवाडी, चाबुकस्वारवाडी, जानरावाडी, बामनोली, खंडेराजुरी, सोनी, व्यकोंचीवाडी, बुधगाव, कुपवाड, सावळी, तानंग, बोलवाड, मल्लेवाडी, बेडग, म्हैसाळ, वड्डी, नरवाड, खटाव, लिंगनुर, सलगरे, शिपुर, मिरजग्रा, येरडोली, करोली, मालगांव, टाकळी, कळंबी, बेळंकी, कदमवाडी, संतोषवाडी, रसुलवाडी, कौवलापुर, गुंडेवाडी, बिसुर, पाटगांव, भोसे, माणमोडी, आरग, शिंदेवाडी, |
| | कवठेम हांकाळ | कोंगनोळी, खबडेवाडी, जाधववाडी, विठुरायाचीवाडी, मोरगांव, अलकुड एस., बनेवाडी., रांजणी, लोणारवाडी, धुळगांव, पिंपळगाव, नांगोळे, कुची, जायगव्हाण, कदमवाडी, शिरढोण, मळणगांव, म्हैसाळ, बोरगांव, |

| | | |
|---|---|---|
| | | रामपुरवाडी, तिमलवाडी, कुकटोळी, जाधववाडी, खरसींग, सराटी, हरोली, कवठेमहांकाळ, लांडगेवाडी, हिंगणगाव, शिंदेवाडी, झुरेवाडी, देशींग, करोली टी., बंडगरवाडी |
| | तासगाव | हातुनर, पुनदी, चिंचणी, मल्लिकार्जुनवाडी, आरवडे, डोर्ली, कोलगे, लोढे, गणेशवाडी, मतकुणकी, निंबळक, चिखलगोठण, आळते, विसापुर, लिंब, हातनोली, वासुंबे, नागावकवटे, कुमठे, उपळादी, धुळगाव, पारगांव, पानमळेवाडी, वंजारवाडी, वज्रचौडे, गव्हाण, बोरगांव, गणेराजुरी, सावर्डे |
| | कडेगांव | चिंचणीवांगी, अंबक, वांगी, तडसर, हिंगणवांगी खुर्द, सहोली, कडेगाव, चिखली, शिवणी, आमरापुर, हणमंतवाडीये, खेराडेविटा, भिकवड खुर्द, वडीयेरायबाग, नेवरी, शेळकबाव, शिरगाव, रामापुर, सोनकिरे, पाडळी, सोनसळ, शिरसगाव, येवलेवाडी, कडेपुर, देवराष्ट्रे, कुंभारगाव, मोहीते वडगांव, आसद |
| | खानापुर | कळंबी, भाळवणी, कमळापुर, खंबाळेभा, आळसंद, तांदुळवाडी, कार्वे, वाझर, मंगरुळ, बामणी, बलवडी (भा) |
| | पलुस | कुंडल |

सदर शासन परीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन संकेताक २०२४०८१४१६२२२२७११९ असा आहे. सदरचे परीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**आपला,**

ABHIJEET JAYPRAKASH GAWADE

Digitally signed by ABHIJEET JAYPRAKASH GAWADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=5cb66d14be1cf2c603a34ff042d3ac08ef8530ed96598ba80d578297cb68433b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9CDDF35B2654F4905CB9A649DC8A93D4B78215BADAB187E8037F68923D155F05, cn=ABHIJEET JAYPRAKASH GAWADE
Date: 2024.08.16 14:54:51 +05'30'

**(अभिजीत गावडे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मा. मंत्री (मदत व पुनर्वसन) मंत्रालय, मुंबई
२. मा. प्रधान सचिव (मदत व पुनर्वसन) मंत्रालय, मुंबई
३. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे
४. जिल्हाधिकारी, सांगली
५. उप सचिव (पुनर्वसन) महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अपर जिल्हाधिकारी, सांगली
७. जिल्हा पुनर्वसन अधिकारी, सांगली
८. संबधित तहसिलदार, जिल्हा सांगली